GR200409801122458002-[26]

जलसंधारण कार्यक्रमांतर्गत "एकात्मिक पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रम" राबविण्याबाबत.
प्रकल्प गाव निवडीचे निकष शिथील करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
शासन परिपत्रक क्र.जलसं १०९५/प्र.क्र.२५०/जल ७,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १० जून, २००४.

**वाचा** :- शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जलसं १०९५/प्र.क्र.२५०/जल ७, दि.३० जानेवारी, १९९६.

**प्रस्तावना** :-

उपरोक्त शासन निर्णयानुसार प्रकल्प गावे निवडण्यासाठी खालीलप्रमाणे निकष ठरविण्यात आले होते:-

१. पिण्याच्या पाण्याची तीव्र समस्या असलेली म्हणजे ज्या गावात गेली ३ वर्षे सतत टँकरने पाणी पुरवठा केला जातो अशी गावे व ज्या ठिकाणी पिण्याच्या पाण्याचे स्त्रोत उपलब्ध नाहीत व अस्तित्वात असलेले स्त्रोत कार्यरत व पुरेसे नाहीत.
२. ज्या गावातील पडीक व अवनत जमिनीची व्याप्ती व तीव्रता जास्त आहे.
३. भूजल सर्वेक्षण व विकास संचालनालयाने जाहीर केलेली "अति उपसा पाणलोटातील" गावे.

सदर शासन निर्णय हा आठ वर्षापूर्वीचा असून त्यानंतर दिवसेंदिवस पाणी टंचाईने उग्र स्वरुप धारण केलेले आहे. या पार्श्वभूमीवर प्रकल्प गाव निवडीचे निकष शिथील करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या बाबींवर सांगोपांग विचार करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**परिपत्रक** :-

गावांची प्रकल्पासाठी निवड करतांना ती गावे कोरडवाहू क्षेत्रातील आहेत व तेथे तीव्र पाणी टंचाई आहे वा सदर गावांचा जिल्हाधिकाऱ्यांनी तयार केलेल्या पाणी टंचाईच्या गावांच्या कृति आराखड्यात समावेश आहे अशा गावामध्ये जलसंधारणाचा कार्यक्रम राबविण्यास हरकत नाही. तथापि ग्रामसभेच्या २/३ बहुमताच्या ठरावाची आवश्यकता राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रमेशचंद्र कानडे
( रमेशचंद्र कानडे )
सचिव, जलसंधारण विभाग.